<u>सन २०२१-२२ करिता</u>
**सन २०२१-२२ या वर्षाकरिता वृक्ष लागवड व संगोपन या कार्यक्रमांतर्गत निधी वितरण**
**लेखाशिर्ष (२४०६ A २५६)**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : अर्थसं२०२१/प्र.क्र. ६५/पापु-०३**
७ वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल,
क्रॉफर्ड मार्केट जवळ, लोकमान्य टिळक मार्ग,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : २३ नोव्हेंबर, २०२१.

**<u>प्रस्तावना</u> :-**

हरित महाराष्ट्र संकल्पना राबविण्यासाठी सन २०२१-२२ या वर्षाकरिता वृक्ष लागवड व संगोपन या कार्यकमांतर्गत पाणी पुरवठा व स्वच्छता विभागास ६.५१ लक्ष वृक्ष लागवडीचे उद्दिष्ट देण्यात आले होते. वृक्ष लागवड कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसंदर्भात नेमुन दिलेले उद्दिष्ट साध्य करण्यासाठी मागणी क्रमांक वाय-३, २४०६-वनीकरण व वन्यजीवन, ४-वनीकरण व पर्यावरण विकास, १०१-राष्ट्रीय वनीकरण व पर्यावरण विकास कार्यक्रम (०१) शाश्वत विकास अंतर्गत वृक्ष लागवड आणि संगोपन (१०० टक्के राज्य योजना) ०२- मजुरी (२४०६ A२५६) व २१-पाणी पुरवठा व सामग्री (२४०६ A२५६) या लेखाशिर्षांतर्गत सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाकरिता रुपये ०६.८६ लक्ष इतकी तरतुदी करण्यात आलेली आहे. यापैकी ५०% रक्कम रूपये ३.४३ लक्ष इतकी रक्कम बिम्स प्रणालीवर उपलब्ध आहे. सदर तरतूद वितरीत करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**<u>शासन निर्णय</u> :-**

सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात मागणी क्रमांक वाय-३, २४०६-वनीकरण व वन्यजीवन, ४-वनीकरण व पर्यावरण विकास, १०१- राष्ट्रीय वनीकरण व पर्यावरण विकास कार्यक्रम (०१) शाश्वत विकास अंतर्गत वृक्ष लागवड आणि संगोपन (१०० टक्के राज्य योजना) ०२- मजुरी (२४०६ A२५६) व २१- पाणी पुरवठा व सामग्री (२४०६ A२५६) या लेखाशिर्षांतर्गत सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई,व आयुक्त, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे, या कार्यालयांना हरित महाराष्ट्र संकल्पना राबविण्यासाठी सन २०२१-२२ या वर्षाकरिता वृक्ष लागवड व संगोपन या कार्यकमांतर्गत पाणी पुरवठा व स्वच्छता विभागास ६.५१ लक्ष वृक्ष लागवडीचे उद्दिष्ट देण्यात आले होते.

**०२.** वृक्ष लागवड व संगोपन या कार्यक्रमांतर्गत लेखाशिर्ष (२४०६ A२५६) सन २०२१-२२ मध्ये रुपये ६.८६ लक्ष इतक्या निधीची तरतूद करण्यात आली आहे. यापैकी ५०% रक्कम रूपये ३.४३ लक्ष इतकी रक्कम बिम्स प्रणालीवर वित्त विभागामार्फत उपलब्ध करुन देण्यात आली आहे.

**०३.** वृक्ष लागवड व संगोपन या कार्यक्रमांतर्गत सन २०२१-२२ मध्ये तरतूद करण्यात आलेले रुपये ३.४३ लक्ष इतका उपलब्ध निधी अंमलबजावणी यंत्रणा महाराष्ट्र जीवन प्राधिकरण विभागीय कार्यालय अमरावती व नागपूर विभागाला उपलब्ध निधीच्या प्रत्येकी १,७१५००/- (५०% टक्के) याप्रमाणे वितरीत करण्यात येत आहे.

**०४.** वृक्षारोपणाचा दृष्य परिणाम दिसून येण्यासाठी संवर्धन,पाणीपुरवठा,जनावरांपासून रोपांच्या संरक्षणासाठी जैविक किंवा तारांचे/प्लॅस्टीक कुंपण,कायम स्वरुपी देखभाल,जोपासना व संगोपन इत्यादी कामांचे नियोजन करावे. संबंधित यंत्रणांनी या वृक्षांचे जिवंत राहण्याचे प्रमाण ( Survival Rate ) किमान ८०% ते ९०% राहणेबाबत काळजी घ्यावी.

०५. सदर अनुदान संबंधित यंत्रणांना पुढील अटींवर रोख मुक्त करण्यात येत आहे :-

अ) हे अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आले आहे त्याच प्रयोजनासाठी संबंधित यंत्रणांनी खर्च करावे.

ब) या योजनेअंतर्गत घेतलेल्या कामांचा भौतिक व आर्थिक प्रगती अहवाल, सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण ,मुंबई व आयुक्त, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे , यांचेकडे दर महिन्याला ५ तारखेपर्यंत न चुकता सादर करावा.

क) शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या सुचनेप्रमाणे या अनुदानांच्या खर्चाचा महालेखापाल कार्यालयात नोंदविलेल्या खर्चाशी ताळमेळ घालावा व ताळमेळाचे अहवाल विहित कालावधीत या विभागाला कार्यासन क्र.पापु-०३ ला सादर करावे

ड) वरील मंजूर अनुदानाची उपयोगिता प्रमाणपत्रे शासनाकडे विहित प्रपत्रात व विहित कालावधीत सादर करण्यात यावी.

०६. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अर्थसं २०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.२४ एप्रिल,२०२१,२४ जुन, २०२१, २९ जुलै, २०२१, १४ ऑक्टोबर,२०२१ अन्वये या विभागास प्रदान केलेल्या अधिकारात तसेच सदर परिपत्रकातील अटी व शर्तींच्या अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संकेतांक २०२१११२३१२११२१७४२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vasant Bhimrao Mane

Digitally signed by Vasant Bhimrao Mane
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=280e2beac20f526041fee94f6226522e1407a7f6aa0b06c8769634d48c2976bc, pseudonym=04E9E52AD2D2BFBC7A8BAB7F38309149E2A32DAE, serialNumber=4412BECACEF186C3494A7DFFC4896B9FFD9D66E8EC00DF8E35709DC13741075D, cn=Vasant Bhimrao Mane
Date: 2021.11.24 11:47:51 +05'30'

**( वसंत माने )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत :-**

१. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, एक्सप्रेस टॉवर, नरिमन पॉइंट, मुंबई.
२. आयुक्त, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे.
३. महालेखापाल (लेखा परीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १ व २, मुंबई/नागपूर.
४. संचालक (वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
५. मुख्य अभियंता,महाराष्ट्र जीवन प्राधिकरण,अमरावती/नागपूर.
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७. निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
८. वित्त विभाग (कार्या. व्यय-३, बीयुडी-१८), मंत्रालय, मुंबई - ४०००३२.
९. कक्ष अधिकारी (पापु-०४/पापु-२०), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,मंत्रालय,मुंबई-३२
१०. निवडनस्ती (पापु-०३).